राष्ट्रीय कौशल्य विकास अभियानांतर्गत "उपजिविकेसाठी कौशल्य संपादन व ज्ञान जागरूकता अभियान (The Skill Acquisition & Knowledge Awareness for Livelihood Project-SANKALP)" योजनेंतर्गत केंद्र हिश्याचा निधी वितरीत करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: कौविउ-२०१९/प्र.क्र.७०/अभियान-१,**
दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १९ ऑक्टोबर, २०२०

**संदर्भ :**

१. सह सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता मंत्रालय, नवी दिल्ली यांचे अर्धशासकीय पत्र क्रमांक B-१२०११/४८/२०१५-SDE, दिनांक १५/०९/२०१७.

२. कौशल्य विकास व उद्योजकता विभाग/ शासन निर्णय क्र.कौविउ-२०१७/प्र.क्र.१८७/अभियान-१ दिनांक: ३० ऑगस्ट,२०१९

३. कौशल्य विकास व उद्योजकता मंत्रालय, नवी दिल्ली यांचे अर्धशासकीय पत्र क्रमांक F.No.SD-२१/५९/२०२०-IC, दिनांक २९/०७/२०२०.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाच्या कौशल्य विकास व उद्योजकता मंत्रालयामार्फत National Skill Development Mission अंतर्गत, देश व राज्य पातळीवर संस्थात्मक यंत्रणा मजबूत करणे, दर्जेदार प्रशिक्षकांचा समूह तयार करणे, राज्य स्तरावर राबविण्यात येणाऱ्या सर्व कौशल्य प्रशिक्षण कार्यक्रमांचे केंद्रीकरण करणे, कौशल्य विकास प्रशिक्षण कार्यक्रमांचे संनियंत्रण व मूल्यमापन करण्यासाठी प्रभावी यंत्रणा निर्माण करणे, सामाजिकदृष्टया मागासवर्गासाठी कौशल्य प्रशिक्षणाच्या संधी उपलब्ध करून देणे, उत्पादन क्षेत्राकरिता आवश्यक कौशल्ययुक्त मनुष्यबळ निर्माण करणे तसेच मेक इन इंडीया या संकल्पनेस पूरक सहाय्य करणे, या उद्देशांसाठी **"उपजिविकेसाठी कौशल्य संपादन व ज्ञान जागरूकता अभियान (The Skill Acquisition & Knowledge Awareness for Livelihood Project-SANKALP)"** राबविण्यात येणार आहे. सदर प्रकल्पाचा कालावधी ०६ वर्षे असून, प्रकल्प खर्चातील केंद्र व राज्य शासनाचा हिस्सा ६० : ४० या प्रमाणात असणार आहे. सदर प्रकल्प राज्यात राबविण्यास दिनांक ३०/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

२. "उपजिविकेसाठी कौशल्य संपादन व ज्ञान जागरूकता अभियान (The Skill Acquisition & Knowledge Awareness for Livelihood Project-SANKALP)" या योजनेसाठी केंद्र हिश्याचा निधी उपरोक्त संदर्भाधीन क्र. ३ येथील पत्रान्वये राज्य शासनास प्राप्त झाला असून, सदर निधी महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी, मुंबई यांना वितरित करण्याची बाब प्रस्तुत नस्तीवर विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :**

केंद्र शासनाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील पत्रान्वये, राष्ट्रीय कौशल्य विकास अभियानांतर्गत "उपजिविकेसाठी कौशल्य संपादन व ज्ञान जागरूकता अभियान (The Skill Acquisition & Knowledge Awareness for Livelihood Project-SANKALP)" या योजनेसाठी केंद्र हिश्याचा रु. २२,०४,४०,०००/- इतका निधी सन २०१८-१९ करीता खालील विवरणपत्रानुसार राज्य शासनास वितरित करण्यात आला आहे. तसेच उपरोक्त संदर्भाधीन क्र. ३ येथील पत्रान्वये सदर निधी पुर्नवैध करून दिला असून सन २०२०-२१ या वर्षात खर्च करण्यास मान्यता दिली आहे.

| **Major Head – 3601** | |
|---|---|
| 3601.06.101.36.03.31-Grants-in-aid-General | 16,48,89,120 |
| 3601.06.789.19.03.31-Grants-in-aid-General (Scheduled Caste) | 3,65,93,040 |
| 3601.06.796.18.03.31-Grants-in-aid-General (Tribal Areas) | 1,89,57,840 |
| **TOTAL** | **22,04,40,000** |

२. या योजनेच्या वार्षिक आराखड्यापैकी रुपये ३६.७४ कोटींचा वार्षिक आराखडा मान्य असून, यामध्ये केंद्र हिश्श्याचे (६०%) रुपये रु. २२,०४,४०,०००/- तर राज्य हिश्याचे (४०%) रुपये १४,६९,६०,००० इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सद्यस्थितीत वित्त विभागच्या दिनांक ०४.०५.२०२० रोजीच्या शासन निर्णयानुसार कार्यक्रमांतर्गत योजनेसाठी ३३ टक्केची मर्यादा विचारत घेऊन या योजनेसाठी वित्त विभागाने केंद्र हिश्यापैकी (६० टक्के) सर्वसाधारण घटकारीता रु. १६,४८,८९,१२०/- इतक्या मंजूर निधीपैकी ,रु.५.५४ कोटी इतका निधी वितरित व खर्च करण्यास मान्यता दिली आहे.

३. वित्त विभागाच्या मान्यतेस अनुसरुन "उपजिविकेसाठी कौशल्य संपादन व ज्ञान जागरूकता अभियान (The Skill Acquisition & Knowledge Awareness for Livelihood Project-SANKALP)" या योजनेसाठीच्या सर्वसाधारण घटकाकरीता रु.५.५४ कोटी इतका निधी वितरित व खर्च करण्यास मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी, मुंबई यांना मान्यता देण्यात येत आहे. या योजनेच्या राज्य हिश्श्यासाठी सन २०२०-२१ मध्ये अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली असून, सदर निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आला आहे. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी, मुंबई यांना सदरचा निधी खर्च करण्यासाठी आहरण, संवितरण व नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी खर्च करताना मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी, मुंबई यांनी खालील अटी व शर्तींचे पालन होईल याची दक्षता घेण्यात यावी.

१. सदरचा खर्च (०१) (१५)उपजिविकेसाठी कौशल्य संपादन व ज्ञान जागरूकता अभियान - संकल्प, ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) २२३० ए ३८१ या लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा.

२. केंद्र पुरस्कृत उपजिविकेसाठी कौशल्य संपादन व ज्ञान जागरूकता अभियान (The Skill Acquisition & Knowledge Awareness for Livelihood Project-SANKALP)" या योजनेसाठीचा खर्च करण्याची कार्यवाही केंद्र शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचनांनुसार करण्यात

यावी. व याबाबतचे लेखे स्वतंत्र ठेवून खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र व इतर तपशील केंद्र शासनाच्या संबधीत मंत्रालयाकडे तसेच शासनाकडे पाठविण्याची दक्षता मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी यांनी घ्यावी. तसेच सदर लेखे महालेखापाल यांना लेखा तपासणीच्यावेळी उपलब्ध करुन देण्यात यावेत.

३. सदर निधी खर्च करताना वित्तीय अधिकार नियमांचे तसेच वित्त व नियोजन विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना/नियम/अटी/शर्ती यांचे पालन करण्यात यावे.

प्रस्तुत शासन निर्णय नियोजन विभाग, अनौपचारीक संदर्भ क्रमांक ९५२/१४७१, दि.१९/०८/२०२० व वित्त विभाग, अनौपचारीक संदर्भ क्रमांक १४२४/व्यय-६, दिनांक ०४/०९/२०२० अन्वये प्राप्त झालेल्या अधिकार/सहमतीन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२०१०२०१४५४१२४९०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Vithal Rokade

Digitally signed by Santosh Vithal Rokade
DN: c=IN, o=Skill Development and Entrepreneurship Department, Government Of Maharashtra, ou=eOffice, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d061483d7d35e20f744e251360f7920a, serialNumber=ecf4a9abe84c70de989c3669424c12b6cadcb583d500fe489ce8727916e0bbee, cn=Santosh Vithal Rokade
Date: 2020.10.21 11:48:56 +05'30'

**( संतोष रोकडे )**
अवर सचिव, महाराष्ट्र राज्य

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. सर्व मा. मंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
६. सर्व विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य
७. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
८. सर्व मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी, मुंबई
१०. कोषागार कार्यालय, मुबई
११. महालेखापाल मुंबई/नागपूर
१२. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, कोकण भवन, मुंबई
१३. सह सचिव/उप सचिव/अवर सचिव कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय मुंबई
१४. सर्व कार्यासने, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. निवड नस्ती. (अभियान-१)